**जिल्हा शल्यचिकित्सक, गोंदिया यांचेकडील प्रलंबित देयके अदा करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः देयक -२०१८/प्र.क्र. १३३/आरोग्य -८**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपाउंड, कॉम्पलेक्स बिल्डींग,
१० वा मजला, नविन मंत्रालय, मुंबई- ४००००१.
दिनांक: ३० नोव्हेंबर, २०१९.

वाचा-: १)सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र-संआसे/कक्ष-३/टे-४/प्रलंबित देयके/अदायगी / गोंदीया/२००९-१० ते १५-१६/३४८४-८८/१८ दिनांक ०२.०४/२०१८

२)वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्रक्र३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.४.२०१५.

३)सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक खरेदी १००७/प्र.क्र.६१/आरोग्य-८, दिनांक ४.१२.२००७.

४)सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांक-संआसे/कक्ष-३/टे-४/प्रलंबित देयके/अदायगी/ गोंदिया/२००९-१०ते १५-१६/२०३९-४१, दिनांक २.११.२०१८

५)सहसंचालक आरोग्य सेवा संचालनालय मुंबई यांचे पत्रक्रमांक संआसे/कक्ष३/टे-४/प्रलंबित देयके/ अदायगी/गोंदीया/२००९-१० ते १५-१६/१२४६९-७१, दिनांक १३.९.२०१९

**प्रस्तावना-:**

सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे जिल्हा शल्यचिकित्सक, गोंदिया यांनी सन २००९ - २०१० ते सन २०१५-२०१६ या कालावधीतील स्थानिक स्तरावर औषधी, साहित्य व सामुग्रीची खरेदी केलेल्या व अदयाप पर्यंत अदा न केलेली, रुपये ५७,०२,३२१/- (रु. सत्तावन लाख दोन हजार तिनशे एकवीस फक्त) इतकी रक्कम अदा करण्यासाठी विनंती केली आहे. त्याअनुषंगाने सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी वित्त विभागाचे शासन निर्णय दिनांक १७.४.२०१५ मधील नियम क्रमांक ४० नुसार महाराष्ट्र कोषागार नियम -१९६८,खंड-१ मधील नियम १५१ (१) मधील विहित केलेल्या प्रपत्रात माहिती सादर केली आहे. वित्त विभागाचे शासन निर्णय दिनांक १५ मे २००९ अन्वये मुंबई वित्तीय नियम १९५९ भाग पहिला उपविभाग एक नियम ४० नुसार कार्यालयात उपलब्ध असलेल्या परिपोषक अभिलेख्यांच्या आधारे दाव्यांची तपासणी व पडताळणी करण्यात आली आहे आणि हे दावे यापूर्वी कधीही काढण्यात आले नव्हते व त्यांचे प्रदान करण्यात आले नाहीत, याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्याअनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय-:**

सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक ०२.०४.२०१८ अन्वये प्रस्तावित केल्या प्रमाणे जिल्हा शल्यचिकित्सक, गोंदिया यांनी सन २००९-१० ते २०१५-१६ या कालावधीत स्थानिक स्तरावर औषधी, साहित्य व सामुग्रीची खरेदी केलेल्या रुपये ५७,०२,३२१/- (रु.सत्तावन लाख दोन हजार तिनशे एकवीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्यासाठी सन २०१९-२० या वित्तिय वर्षातील अर्थसंकल्पिय अनुदान वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या लेखाशिर्ष २२१० ०१४६ अंतर्गत २१ पुरवठा व सामुग्री या उपलेखाशिर्षाखाली खर्च करण्यासाठी प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्रक्र-३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला,उपविभाग एक मधील नियम -४० नुसार प्रशासकिय विभागास असलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहेत,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gpv.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९११३०११४०४५४८१७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.11.30 12:23:32 +05'30'

(ज.स.तडवी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)